**उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील करमाळा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१९/३/प्र.क्र.०२/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १८/०१/२०१९

**वाचा -**

१) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण २०११/प्र.क्र.८० (भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
७) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
९) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र: पुनर्व/उपले/आर आर/४२८३/२०१८, दि. ०१/१/२०१९

**प्रस्तावना -**

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भाधिन क्र. ९ अन्वये उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील करमाळा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील एकूण १५ नागरी सुविधा कामांची रु. ४०६.३७ लक्ष रकमेची एकत्रित ०७ अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केली आहेत.

२. याबाबत शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ अन्वये प्रदान व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२)(अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार, सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पातील पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत शासन निर्णय क्र. संकिर्ण २०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि.२५/०७/२०१३ निर्गमित करण्यात आला आहे.

तदनंतर संदर्भाधिन क्र. ५ व ८ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा

प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या प्रस्तावामध्ये नमूद नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय-

**त्यानुसार, उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील करमाळा तालुक्यातील मौजे भिवरवाडी, चिखलठाण नं. २ व इतर ५ अशा ०७ पुनर्वसित गावठाणांमधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद नागरी सुविधा कामांच्या एकूण रू. ४,०६,३६,७१७/-(अक्षरी रूपये चार कोटी सहा लक्ष छत्तीस हजार सातशे सतरा फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना सक्षम प्राधिकारी यांनी प्रथम तांत्रिक मान्यता प्रदान करावी व सदर तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम (१८) अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, सोलापूर यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हापरिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या सदर सुविधा अन्य योजनेतून पुनश्च: पुरविल्या जाणार नाहीत याची विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी तसेच संबंधित यंत्रणा यांनी दक्षता घ्यावी.

७) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्पयंत्रणेने दक्षता घ्यावी.

२. निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-

**अ)** कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश

देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

**ड)** कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी वरील क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमावरील खर्च) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८१६२०२९०५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2019.01.18 16:30:47 +05'30'

**(द.शं.मुंजाळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सोलापूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
५. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर
६. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
१०.उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन) सोलापूर
११.जलसंपदा विभाग /मोप्र-२, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१४.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.
१५.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रः पुनर्व-२०१९/३/प्र.क्र.०२/र-८,दि. १८/०१/२०१९ सोबतचे विवरणपत्र**

**उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील करमाळा तालुक्यातील मौजे भिवरवाडी, चिखलठाण नं.२ व इतर ५ पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांचा तपशील**

| अ क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रु. | गावठाणनिहाय एकूण रक्कम रु. |
|---|---|---|---|---|
| १ | भिवरवाडी | ग्रामपंचायत कार्यालय शौचालय आणि झेंडा कट्टासह | १२,९३,०८७/- | ६६,३६,६८९/- |
| | | बसथांबा | २,५०,६२८/- | |
| | | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | ४१,११,५७४/- | |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | ९,८१,४००/- | |
| २ | चिखलठाण नं. २ | स्मशानभूमी पोहोच रस्ता | १४,८२,२८४/- | ३८,८३,५२०/- |
| | | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | १८,१९,८७०/- | |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | ५,८१,३६६/- | |
| ३ | चिखलठाण १ | स्मशानभूमी पोहोच रस्ता | ३३,८३,७२९/- | ९२,७५,८३६/- |
| | | सिमेंट कॉक्रीट गटार बांधणे | २१,०१,९७२/- | |
| | | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | २४,२५,२७०/- | |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | १३,६४,८६५/- | |
| ४ | ढोकरी | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | ३७,०१,७६०/- | ४३,५१,०५९/- |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | ६,४९,२९९/- | |
| ५ | दहीगाव | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | १६,६४,९६३/- | ३२,५८,१२२/- |
| | | स्मशानभूमी पोहोच रस्ता | ११,०२,६६२/- | |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | ४,९०,४९७/- | |
| ६ | वांगी नं. १ | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | २९,२३,५५७/- | ३४,४०,५६२/- |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | ५,१७,००५/- | |
| ७ | वांगी नं. ३ | ग्रामपंचायत कार्यालय शौचालय आणि झेंडा कट्टासह | १२,७२,४८२/- | ९७,९०,९२९/- |
| | | अंतर्गत खडीकरणाचे रस्ते | ३८,८५,०४६/- | |
| | | स्मशानभूमी पोहोच रस्ता | ३१,९३,६९३/- | |
| | | १२% जीएसटी, २०,०००/- हस्तांतरण चार्जेस व इतर | १४,३९,७०८/- | |
| | | | **एकूण** | **४,०६,३६,७१७/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2019.01.18 16:31:06 +05'30'

**( द.शं.मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**